राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०२२-२३ ते २०२३-२४ साठी राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, हृदयरोग व पक्षाघात प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रम (NPCDCS) कार्यक्रमासाठी मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यात उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीतून औषधी खरेदी करण्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्र.प्रशामा-१२२२/प्र.क्र.२३/ आरोग्य-७**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक:- ०७ मार्च, २०२५

**वाचा:-**

(१) शासन निर्णय क्र. प्रशामा- १२२२/प्र.क्र.२३/ आरोग्य-७, दि. २४.०३.२०२३.
(२) राष्ट्रीय आरोग्य अभियान NP-NCD कार्यक्रम मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखडा २०२२-२३ व २०२३-२४.
(३) राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र. / राआसोम / राकव्य/ कार्य. समिती ४६ इतिवृत्त / ३९७३९- ८३१ /२०२४, दि. २४.०९.२०२४.
(४) सहसंचालक (असंसर्गजन्य रोग) आरोग्य सेवा, मुंबई यांचे जा.क्र.आसेआ/NCD/NP-NCD/ औषधे व उपकरण सुधारीत प्र.शा.मा./१४६१-१४६४/२४,दिनांक १४.११.२०२४

**प्रस्तावना:-**

सहसंचालक (असंसर्गजन्य रोग),आरोग्य सेवा, मुंबई यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (४) अन्वये सन २०२२-२३ ते २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आरखड्यात राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, हृदयरोग व पक्षाघात प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रम (NPCDCS) या कार्यक्रमांतर्गत औषधे, औषधी साहित्य व उपकरणे खरेदीसाठी Sr. No. (FMR Code) १०७, १०८, १०९ व ११० या घटकातंर्गत मधुमेह औषधे, उच्चरक्तदाब औषधे, व औषधी साहित्य (Consumables), STEMI Thrombolytic औषधे, COPD औषधे व कॅन्सर केअर उपकरणे यांच्या खरेदीकरीता प्रशासकीय मान्यता दि.२४/३/२०२३ रोजी प्राप्त झाली होती. सदर प्रशासकीय मान्यतेचा कालावधी दि. २४.०३.२०२४ रोजी संपुष्टांत आल्याने सहसंचालक (असंसर्गजन्य रोग), आरोग्य सेवा, मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या

अनुषंगाने राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमातंर्गत मधुमेह, उच्चरक्तदाब व स्टेमी करिता आवश्यक औषधे खरेदी करण्यासाठी सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमातील सन २०२२-२३ व २०२३-२४ या आर्थिक वर्षातील मंजूर कृती आराखडयात औषधी व उपकरणे खरेदी करीता FMR Code NCD ५, Sr. No. १०७ , १०८, १०९, ११० या घटकातंर्गत मधुमेह औषधे, उच्चरक्तदाब औषधे, व औषधी साहित्य (Consumables), STEMI Thrombolytic औषधे, COPD औषधे व कॅन्सर केअर उपकरणे खरेदी करण्याकरीता दिनांक २४/०३/२०२३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. तथापि, सदर प्रशासकीय मान्यतेचा कालावधी संपुष्टात आल्याने या शासन निर्णयाद्वारे खालील विवरणपत्रात नमुद केलेल्या बाबी खरेदी करण्यासाठी सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(अ) औषधे:-

| (A) HYPERTENSION & DIABETES DRUGS | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| **FMR Code** | **Tablet** | **Proposed Quantity for Year 2022-23** | **Proposed Quantity Year 2023-24** | **Total Proposed Quantity for 2 Year** | **Approximate Rate (new)** | **Approximate Budget Rs.** |
| 107 | Amlodepine 5mg | 86793171 | 135614330 | 222407501 | 0.116 | 25799270 |
| 107 | Chlorthalidone 6.25mg | 2006784 | 3135600 | 5142384 | 0.24 | 1234172 |
| 107 | Chlorthalidone 12.5mg | 877248 | 1370700 | 2247948 | 0.31 | 696864 |
| 107 | Glimeperide 1mg | 460800 | 720000 | 1180800 | 0.15 | 177120 |
| 107 | Glimeperide 2mg | 99072 | 154800 | 253872 | 0.16 | 40620 |
| 107 | Acetyl Salicylic Acid Tab 75 mg | 1670400 | 2610000 | 4280400 | 0.22 | 941688 |
| 107 | Losartan 50 mg | 1920960 | 3001500 | 4922460 | 0.43 | 2116658 |
| 107 | Atrovastatin 10mg | 1670400 | 2610000 | 4280400 | 0.27 | 1155708 |
| 108 | Telmisartan 40 mg | 35429706 | 61085700 | 96515406 | 0.44 | 42466779 |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 108 | Telmisartan 80mg | 17143524 | 29557800 | 46701324 | 0.896 | 41844386 |
| 108 | Metaformin 500 mg | 19339578 | 33344100 | 52683678 | 0.2632 | 13866344 |
| **SUB-TOTAL (A)** | | | | | | **130339608** |
| **(B)STEMI DRUGS** | | | | | | |
| 109 | Inj. Tenecteplase 40mg | 0 | 86 | 86 | 19712 | 1695232 |
| 109 | Metoprolol Tab 50mg | 0 | 40000 | 40000 | 0.54 | 21600 |
| 109 | Clopidogrel Tab 75mg | 0 | 600000 | 600000 | 0.62 | 372000 |
| 109 | Ramipril 5 mg | 0 | 9380 | 9380 | 1.84 | 17259 |
| **SUB TOTAL (B)** | | | | | | 2106091 |
| **TOTAL (A+B)** | | | | | | **132445700** |
| **Total (in lakhs)** | | | | | | **1324.457** |

<u>अटी व शर्ती :-</u>

१) सदर औषधांची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबीच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू औषधे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ज्ञांची तांत्रिक समिती / अधिकारी यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले खातरजमा करण्यात यावी, पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबीच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबीचीच खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क. भांखस-२०१५/प्र.क्र.८२/भाग उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत, त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दरकरार, National Pharmaceutical Pricing Authority NPPA). National Medical Devices Authority (NDMA) यांच्याकडील उपलब्ध असलेल्या न्युनतम दर विचारात घेण्यात यावेत. तसेच महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्रधिकरण, मुंबई संस्थेतील सदर बाबींची खरेदी केली जात असल्यास अथवा झालेली असल्यास निविदेत प्राप्त झालेले न्युनतम दर निविदेकरीता मागणी नोंदवितांना औषधी संदर्भात अंदाजित दर म्हणून नोंदविण्यात यावेत व खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे. त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/ Post-dispatch random sample Inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत NPCDCS योजनेकरीता प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) द्वारे सन २०२२-२३ व २०२३-२४ या दोन या आर्थिक वर्षांसाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. तसेच सदर बाबींकरीता पुरवठा आदेश देण्यापूर्वी निधीची उपलब्धताही तपासून घेण्यात यावी.

८) तसेच या बाबींच्या खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र. समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्वता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत. सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी २०१६/प्र.क. २४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै २०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

१२) प्रस्तावित करण्यात आलेल्या औषधे खरेदी पुढील दोन आर्थिक वर्षाकरीता म्हणजेच सन २०२२-२३ व २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या निधीतून करण्यात येणार असल्याने बाबनिहाय संख्येची निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

१३) बाबनिहाय निविदा पूर्ण झाल्याबाबत आरोग्य सेवा आयुक्तालयास कळविण्यात यावे, जेणेकरुन त्या-त्या वेळी संबंधित बाबीचा साठा व प्रत्यक्ष आवश्यकता विचारात घेऊन वितरण यादी देता येईल. तसेच दोन वर्षात किमान ४ टप्प्यात खरेदी आदेश देण्यात येतील व याबाबत निविदेत अट टाकणे आवश्यक राहील.

०४. उपरोक्त अनुक्रमांक १ ते १३ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान व संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय तसेच संबंधित कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

०५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०७१६१६४८२२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA
VITTHAL
KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2025.03.07 18:10:43 +05'30'

**( राजेंद्र वि. कुडले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत :-

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२. संचालक मुंबई, आरोग्य सेवा, मुंबई
४. संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५. सहसंचालक (तांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
६. सहसंचालक (असंसर्गजन्य रोग), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
७. सहसंचालक (रुग्णालये), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
८. राज्य कार्यक्रम व्यवस्थापक (SPM), MIS कक्ष - राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई